जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणामध्ये लागू करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचारी आकृतीबंधातील पदांना दिनांक ०१.०९.२०२० ते दिनांक २८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः जिग्राप्र-२०२०/प्र.क्र.२९/योजना-५**

बांधकाम भवन , तळमजला,
२५,मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
तारीख: ५ ऑक्टोंबर, २०२०

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रा.वि.वि., आदेश क्र.जिग्राप्र-२०१९/प्र.क्र.३०/योजना-५ , दिनांक १९.०७.२०१९
२) **वित्त विभाग शासन निर्णय क्र**.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि १२.०२.२०२०.
३) **ग्रा.वि.वि., शासन निर्णय क्र**.जिग्राप्र-२०२०/प्र.क्र.१४/योजना-५ , दि.१२.०३.२०२०.
४) **वित्त विभाग शासन निर्णय** क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि ३१.०८.२०२०.

प्रस्तावना -

केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा केंद्र हिस्सा, वित्त विभागाने आकृतीबंध सुधारित करण्याचे दिलेले निर्देश तसेच प्रस्तावित पदांचा अंतिम आढावा उच्चाधिकार समितीसमोर सादर करुन त्यांस मान्यता मिळणे व त्याबाबतचे आदेश निर्गमित करणे याकरीता काही कालावधी लागणार असल्याने सद्यस्थितीत कामाकरीता पदांची आवश्यकता विचारात घेता जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणामध्ये १५ पदे चालू ठेवण्याबाबतचे निदेश दिनांक १९ जुलै, २०१९ च्या पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व) यांना देण्यात आलेले आहे. यानुषंगाने राज्यातील ३४ जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकरीता प्रत्येकी१५ पदे असे एकूण ५१० अस्थायी पदांना विभागाच्या दिनांक१२ मार्च, २०२० च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आलेली होती.

**शासन निर्णय-**

या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-'अ' मध्ये नमूद केल्यानुसार राज्यातील ३४ जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमधील एकूण ५१० अस्थायी पदे दिनांक ०१.०९.२०२० ते दिनांक २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर पदांच्या वेतन व भत्ते यांचा खर्च ग्राम विकास विभाग मागणी क्र.एल-३, २५१५- इतर ग्रामीण विकास कार्यक्रम,००-१०४- जिल्हा ग्रामीण विकास अभिकरण-प्रशासन (००)(०१)-जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासकीय खर्च (केंद्र पुरस्कृत योजना) (२५१५ २५९३ केंद्र हिस्सा ६० %) व (२५१५ २६०१ राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) ३६-सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२०२१ च्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क., दिनांक ३१.०८.२०२० अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००५१४२७४२४६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Sudhakar Pathak

Digitally signed by Hemant Sudhakar Pathak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a58924bb1ebc2ed6699e048bfa42ad41d1ed32de1e3eda84d0c03040473905e, cn=Hemant Sudhakar Pathak
Date: 2020.10.05 17:06:09 +05'30'

**(हे.सु. पाठक)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.

३. मु.का.अ., जि.प.तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,(सर्व).

४. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व).

५. सचिव केंद्र सरकार,ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली.

६. सचिव (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. सचिव, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.

८. जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर वगळून), (सर्व).

९. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, (सर्व).

१०.अतिरिक्त संचालक,प्रकल्प आखणी व एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष.

११.कक्ष अधिकारी (वित्त-१), ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान रोड,मुंबई.

१२.जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व).

१३.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.

१४.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,महाराष्ट्र राज्य मुंबई.

१५.निवड नस्ती, कार्यासन योजना-५.

## परिशिष्ट-अ

## जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमधील खाली नमूद केलेल्या पदांना मुदतवाढ

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | प्रकल्प संचालक | १ |
| २ | लिपीक टंकलेखक (कनिष्ठ सहायक) | ३ |
| ३ | सहायक प्रकल्प अधिकारी (संनियंत्रण) (म.वि.से.मधून उपलब्धता) | १ |
| ४ | कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता (अभियांत्रिकी शाखा) | १ |
| ५ | सहायक लेखाधिकारी वर्ग-३ | १ |
| ६ | वरिष्ठ लेखा लिपीक | १ |
| ७ | विस्तार अधिकारी (सांख्यिकी) | १ |
| ८ | कार्यालय अधिक्षक | १ |
| ९ | वरिष्ठ सहायक | १ |
| १० | वाहन चालक | २ |
| ११ | शिपाई / परिचर / रखवालदार | २ |
| | **एकुण** | **१५** |